1108/E dtd 03/10/2007

**महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणापुढे शासनातर्फे व संबंधित अधिका-यातर्फे शपथपत्र विहित कालावधीत सादर करणे बाबत.**

महाराष्ट्र शासन
विधि व न्याय विभाग
शासन परिपत्रक क्रमांक : ११०८/"ई" शाखा
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक : ३ ऑक्टोबर, २००७.**

**परिपत्रक**

शासकीय कर्मचारी व अधिकारी यांचेतर्फे त्यांचे सेवाविषयक बाबीसंबंधी प्रकरणे मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणापुढे दाखल केली जातात. सदर प्रकरणांत शासन व संबंधित अधिकाऱ्यांना प्रतिवादी केले जाते. जेव्हा शासन व संबंधित अधिकारी अशा प्रकरणांत प्रतिवादी असतात तेव्हा प्रकरण दाखल झाल्यानंतर, सदर प्रकरणी न्यायाधिकरणासमोर शासनाचा बचाव करण्याच्या दृष्टीने विभागाचे/कार्यालयाचे अभिलेखाच्या आधारे, संबंधित प्रकरणी परिच्छेदनिहाय उत्तर तयार करुन, संबंधित सादरकर्ता अधिकाऱ्यांकडे त्वरित सादर करुन त्या आधारे सादरकर्ता अधिका-यांशी विचार-विनिमय करुन, न्यायाधिकरणापुढे शपथपत्र विहित कालमर्यादेत दाखल करणे शासनाचे विभाग व अधिकारी यांना आवश्यक ठरते. शपथपत्र विहित कालमर्यादेत दाखल न झाल्यास न्यायाधिकरण जबाबदार अधिकाऱ्यांना वादखर्च भरण्यासाठी आदेश देऊ शकते. काही प्रकरणी असे लक्षात येते की, न्यायाधिकरणाने दोन-तीन वेळा संधी देऊनही परिच्छेदनिहाय उत्तराअभावी न्यायाधिकरणापुढे शपथपत्र दाखल होऊ शकली नाहीत. ह्या सर्व बाबींचा विचार करुन, मा.चेअरमन, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण मुंबई , यांनी एका प्रकरणी संबंधित सादरकर्ता अधिकाऱ्यांना असे निर्देशीत केले की, दिलेल्या दोन संधींच्या आत जर शासन विभाग/शासकीय अधिकाऱ्यातर्फे शपथपत्र दाखल झाले नाही तर, न्यायाधिकरणाकडून संबंधित जबाबदार अधिकाऱ्यांना वादखर्च भरण्यासाठी आदेशीत केले जाईल.

मा.चेअरमन, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांचे निदेश लक्षात घेता, विलंब व वादखर्च टाळण्यासाठी, संबंधित विभागांनी आणि अधिकाऱ्यांनी, परिच्छेदनिहाय उत्तरे व संबंधित अभिलेख, संबंधित सादरकर्ता अधिकाऱ्यांकडे विनाविलंब सादर करुन, त्या अधारे शासन विभाग/अधिका-यातर्फे बचावाचे शपथपत्र विहित वेळेपूर्वी दाखल होईल याची दक्षता घ्यावी.

सदर परिपत्रक प्रशासकीय विभागांनी त्यांचे नियंत्रणाखालील कार्यालयांच्या व अधिकाऱ्यांच्या निदर्शनास आणावे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

N. G. Gilani

**(एम.एन.गिलानी)**
**प्रधान सचिव व विधि परामर्शी**

१. मुख्य सचिवांचे कार्यालय,
२. सर्व मंत्रालयीन विभाग,
३. सह सचिव, विधि व न्याय विभाग, मुंबई/नागपूर/औरंगाबाद.
४. **मुख्य सादरकर्ता अधिकारी, मुंबई, नागपूर, औरंगाबाद,**
५. **प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई.**

E br